**इयत्ता ४ थी अखेर प्राथमिक शालेय प्रमाणपत्र परीक्षा घेण्यास मंजुरी**

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक एससीएच २००२/(१२६/०२)/साशि-१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २३ सप्टेंबर, २००२

वाचा :- १) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक एससीएच २००२/(१२६/०२)/साशि-१, दिनांक १५ जुलै, २००२
२) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक एससीएच २००२/(१२६/०२)/साशि-१, दिनांक १६ ऑगस्ट २००२

**शासन निर्णय :-** उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील इयत्ता ४ थी पर्यंतचे वर्ग असलेल्या सर्व शासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था/खाजगी संस्था यांच्या तर्फे चालविण्यात येणा-या शासन मान्यता प्राप्त अनुदानित, विना अनुदानित व कायम विना अनुदानित सर्व माध्यमांच्या शाळांमधील सर्व विद्यार्थ्यांसाठी शैक्षणिक वर्ष २००२-२००३ पासून प्राथमिक शालेय प्रमाणपत्र परीक्षा घेण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. तथापि या परीक्षेबाबत लोक प्रतिनिधींकडून तसेच जनतेकडून आलेल्या प्रतिक्रिया व सूचनांचा विचार करुन शासन, दि. १५.७.२००२ च्या शासन निर्णयात अंशत: बदल करुन पुढीलप्रमाणे सुधारित आदेश देत आहे- :-

१ परीक्षा फेब्रुवारी २००३ ऐवजी एप्रिल २००३ मध्ये आयोजित करण्यात येईल.
२ सर्व विद्यार्थ्यांची परीक्षेची फी शासन भरेल.
३ परीक्षेसाठी यथापूर्व एक तास कालावधीचे तीन पेपर्स असतील. त्यामधील प्रश्नांची काठिण्यपातळी कमी करण्यात येईल.

४ परीक्षा कायम विना अनुदानित तत्वावरच्या शाळांसाठी ऐच्छिक राहील. मात्र जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका तसेच अनुदानप्राप्त शाळांना अनिवार्य राहील.

५ परीक्षेसाठी विद्यार्थ्यांची संपादणूक श्रेणी पध्दतीने जाहीर करण्यात येईल. मात्र शिष्यवृत्ती धारकांच्या याद्या तयार करताना विद्यार्थ्यांची गुणात्मक संपादणूक लक्षात घेण्यात येईल. शाळांची दर्जा पडताळणी शततमकक्रम पध्दतीने जाहिर करण्यात येईल.

६ शाळाबाह्य मुलांना या परीक्षेला बसण्याची इच्छा असल्यास त्यांना परवानगी देण्यात येईल.

७ विद्यार्थ्यांची प्रगती शाळेच्या तीन चाचण्यांच्या सरासरीवर आधारित राहील. त्यामुळे शाळास्तरावर इ.४ थीची वार्षिक परीक्षा घेण्यात येणार नाही.

८ शाळा संलग्नता शुल्काची एकत्रित जिल्हा परिषद व नगरपरिषद शाळांनी ४ टक्के सादिलवारीतून, महानगरपालिका शाळांनी मान्य शासन अनुदानातून, खाजगी अनुदानित शाळांनी वेतनेतर खर्चातून आणि विना अनुदानित शाळांनी त्यांच्या निधीतून खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

९ कायम विनाअनुदानित शाळांमधील इ. ४थी चे सर्व विद्यार्थी या परीक्षेसाठी आवेदनपत्रे भरणार असतील तर त्यांची फी शासन भरेल.

१० अनधिकृत शाळांमधील इ.४थीच्या विद्यार्थ्यांनी या परीक्षेसाठी आवेदनपत्रे अधिकृत शाळेतून दाखल केल्यास त्यांची फी शासन भरेल.

११ अनधिकृत शाळेतील अथवा कायम विनाअनुदानित शाळेतील विद्यार्थ्यांना त्यांची शाळा या परीक्षेला बसविण्यास तयार नसेल तर अशा विद्यार्थ्यांच्या पालकांचे लेखी विनंतीपत्र घेऊन त्यांना परीक्षेला बसण्यास शासन परवानगी देत आहे त्या विद्यार्थ्यांची फी शासन भरेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प. वा. नायर )
उपसचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद